तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांची
बदलीने पदस्थापना (पुणे विभाग)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२४/प्र.क्र.१३१/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३.०८.२०२४

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१
३) भारत निवडणूक आयोगाचे क्र.२३/२०२४-ERS (Vol-II), दि.२६.०६.२०२४
४) भारत निवडणूक आयोगाचे क्र.४३७/६/१/INST/ECI/FUNCT/MCC/२०२४, (Vol-II), दि.३१.०७.२०२४

**शासन आदेश:-**

भारत निवडणूक आयोगाने संदर्भाधीन क्र. ३ व ४ येथील पत्रान्वये विहित केलेल्या तरतुदी व महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार खाली नमूद केलेल्या अधिकारी यांची स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. सुनिल शेळके | तहसिलदार तथा विशेष कार्य अधिकारी, मा.मंत्री वने यांच्या कार्यालयात प्रतिनियुक्तीने | प्रतिनियुक्ती संपूष्टात आणून तहसिलदार जुन्नर जि. पुणे या श्री. रविंद्र सबनीस यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| २. | श्री. दशरथ काळे | तहसिलदार पुनर्वसन विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे | तहसिलदार माणगाव जि.रायगड या श्री. विकास गारुडकर यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ३. | श्री. श्रीकांत पाटील | तहसिलदार इंदापूर जि.पुणे | तहसिलदार (सामान्य शाखा) जि.का. सोलापूर या रिक्त पदावर |
| ४. | श्री. जीवन बनसोडे | तहसिलदार जत जि. सांगली | तहसिलदार इंदापूर जि. पुणे या श्री. श्रीकांत पाटील यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ५. | श्रीमती कल्पना ढवळे | तहसिलदार हातकणंगले जि. कोल्हापूर | तहसिलदार कराड जि. सातारा या श्री. विजय पवार यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| ६. | श्री. सचिन पाटील | तहसिलदार भोर जि. पुणे | तहसिलदार वाळवा-इस्लामपूर जि.सांगली या श्री. प्रदीप उबाळे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ७. | श्री. रविंद्र सबनीस | तहसिलदार जुन्नर जि. पुणे | तहसिलदार (महसूल) जि.का. अहमदनगर या श्री. सुशिल बेल्हेकर यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ८. | श्रीमती रोहिणी बा. शंकरदास | तहसिलदार (संगायो) तहसिल पुणे शहर जि. पुणे | अपर तहसिलदार संख जि.सांगली या श्री. सुधाकर मागाडे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ९. | श्री. विजय पवार | तहसिलदार कराड जि.सातारा | तहसिलदार (सर्वसाधारण) जि.का. कोल्हापूर या श्रीमती सुरेखा दिवटे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| १०. | श्री. प्रदीप उबाळे | तहसिलदार वाळवा- इस्लामपूर जि.सांगली | तहसिलदार तथा विशेष कार्य दंडाधिकारी, जि. कोल्हापूर या श्री. चंद्रशेखर सानप यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ११. | श्री. सुधाकर मागाडे | अपर तहसिलदार संख जि. सांगली | तहसिलदार (संगायो) तहसिल कार्यालय पुणे शहर, जि. पुणे या श्रीमती रोहिणी शंकरदास यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| १२. | श्री. चंद्रशेखर सानप | तहसिलदार तथा विशेष कार्य दंडाधिकारी, जि. कोल्हापूर | तहसिलदार (पुनर्वसन) विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे या श्री. दशरथ काळे यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणा-या पदावर |

२. **उपरोक्त अधिका-यांपैकी जे अधिकारी निवडणूक कामकाजाकरिता अधिसूचित असलेल्या पदावर (AERO) कार्यरत आहेत, त्या पदावर नवीन अधिकारी कार्यभार घेईपर्यंत बदली झालेल्या अधिका-यास कार्यमुक्त करण्यात येऊ नये.** उपरोक्त अधिका-यांना कार्यमुक्त करण्यात आल्याचा दिनांक तसेच नवीन नियुक्तीच्या जागी हजर झाल्याचा दिनांक याबाबत e३.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

३. श्री. विकास गारुडकर, श्री. सुशिल बेल्हेकर व श्री. सुरेखा दिवटे (सर्व तहसिलदार) यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश यथावकाश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. सदर अधिका-यांनी शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग दि.०१.१२.२०२३ अन्वये पुढील आदेशापर्यंत संबंधित विभागीय आयुक्तांकडे रुजू व्हावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये उक्त तरतुदीनुसार पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास त्यांचविरुध्द लोकप्रतिनिधीत्व अधिनियम १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"** *(dies non)* **म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२४०८०३१९०८४२२२१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PRALHAD SAPKAL

Digitally signed by PRASHANT PRALHAD SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=c2ec242caef55e035a22245b60a2752c90753e697f5e56596b3524d34280a891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9548CB33E24729A59B6A5C72EE905604BA53420C8EACFD34E9E8C2460B8AA409, cn=PRASHANT PRALHAD SAPKAL
Date: 2024.08.03 19:23:59 +05'30'

**(प्रशांत सपकळ)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

- सर्व विभागीय आयुक्त

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).